नायब तहसीलदार संवर्गातील अधिकाऱ्यांना मूळ महसुली विभाग बदलून अन्य महसुली विभागात कायमस्वरुपी विभाग बदलून पदस्थापना देणेबाबत.....

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

### शासन निर्णय क्रमांकः मप्रन्या-२०२२/प्र.क्र.१६९(भाग-१)/ई-९

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ३१ जुलै, २०२४.

**वाचा** - १) महसुल व वन विभाग, शासन निर्णय क्र. मलोआ-२४१८/प्र.क्र.१३६/ई-३, दि.१०.०५.२०२१
२) महसुल व वन विभाग, शासन निर्णय क्र. धोरण-२०२२/प्र.क्र.३१/ई-९, दि.१३.०४.२०२२
३) विभागीय आयुक्त, नागपुर विभाग, नागपुर यांचे पत्र क्र.मशा६(३)/आस्था-१/सीआर-१७/२०२२/कावि-८२५/२०२२, दि.०४.०७.२०२२
४) मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपुर यांचे मूळ अर्ज क्र. ६५३/२०२२ मध्ये दिलेले दि.०७.१०.२०२२ रोजीचे आदेश
५) सादरकर्ता अधिकारी, मा. प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपुर यांचे पत्र दि.०७.०६.२०२३
६) विभागीय आयुक्त, नागपुर विभाग, नागपुर यांचे पत्र क्र.मशा६(३)/आस्था-१/सीआर-१७/२२/कावि-९९६/२०२३, दि.०१.११.२०२३
७) सामान्य प्रशासन विभाग, अधिसुचना दि.१४.०७.२०२१

**<u>शासन आदेश:-</u>**

महसूल व वन विभागाच्या उक्त वाचा-१ येथे नमूद शासन निर्णयान्वये नायब तहसिलदार हा संवर्ग राज्यस्तरीय संवर्ग म्हणून घोषित करण्यात आला. तथापि, निम्न संवर्गातून नायब तहसिलदार या संवर्गात पदोन्नती देताना अडचणी उद्भवू लागल्याने दि.१०.०५.२०२१ च्या शासन निर्णयाच्या पार्श्वभूमीवर पदोन्नतीबाबतच्या येणाऱ्या अडचणींचे निवारण करण्यासाठी दि.१३.०४.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये पूरक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. नायब तहसिलदार संवर्गाच्या सेवाज्येष्ठता याद्या पूर्वीप्रमाणेच विभागीय आयुक्त स्तरावर ठेवण्याची आणि तहसिलदार या संवर्गात पदोन्नती देण्याच्या मर्यादित प्रयोजनार्थ अशा याद्या राज्यस्तरावर एकत्रित करण्याची तरतूद करण्यात आली आहे. नायब तहसीलदार संवर्गाची सेवाज्येष्ठतायादी महसूली विभागस्तरावर ठेवण्यात आल्या असल्याने या संवर्गासाठी महसूली विभाग वाटप नियमावली २०२१ लागू होत नाही. परिणामी नायब तहसिलदार संवर्गातील अधिकाऱ्यांना वाटप करण्यात आलेल्या महसूली विभागामध्ये पदस्थापना अनुज्ञेय करण्यात आल्या आहेत. यास्तव नायब तहसिलदार संवर्गाच्या प्रचलित सेवाप्रवेश नियमातील तरतुदीमध्ये सुधारणा

होईपर्यंत सदर शासन निर्णयातील तरतूदी लागू राहतील अशीही तरतुद करण्यात आली असून त्यान्वये कार्यवाही करण्यात येत आहे.

२. श्री. विनायक सुधीर मगर, नायब तहसिलदार व इतर १४ यांनी महसूल व वन विभागाच्या दि.१३.०४.२०२२ च्या शासन निर्णयाविरुध्द मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई खंडपीठ नागपूर येथे मूळ अर्ज क्र.६५३/२०२२ दाखल केला आहे. सदर याचिकेबाबत मा.न्यायाधिकरणाने दि.०७.१०.२०२२ रोजी निर्णय दिला असुन त्याद्वारे याचिकाकर्त्यांचे महसुली विभाग बदलून देण्याबाबत केलेल्या विनंती अर्जाचा विचार करण्याचे निर्देश दिलेले आहेत. त्यानुषंगाने मा. न्यायाधिकरणाने दिलेल्या दि.०७.१०.२०२२ च्या आदेशानुसार याचिकाकर्ते यांच्या बदलीच्या अर्जाचा विचार करुन त्यांना एका विभागातून दुसऱ्या महसूल विभागात बदलीने पदस्थापना देणे आवश्यक असल्याने अर्ज क्र. ६५३/२०२२ मधील एकूण १५ याचिकाकर्त्यांपैकी खालील तक्त्यातील स्तंभ क्र. २ मध्ये नमूद अधिकाऱ्यांना शासन अधिसुचना, सामान्य प्रशासन विभाग, दि.१४.०७.२०२१ मधील तरतुदीनुसार स्तंभ क्र. ४ मध्ये नमूद केलेला महसुली विभाग कायमस्वरुपी बदलुन स्तंभ क्र. ५ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर पदस्थापना देण्यास शासन मान्यता देत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | मूळ विभाग | बदलीने द्यावयाचा विभाग | बदलीनंतर द्यावयाची पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री. अतुल बाळनाथ गांगुर्डे, नायब तहसिलदार (संगायो), तहसिल कार्यालय राजुरा, जि. चंद्रपुर | नागपूर | नाशिक | नायब तहसीलदार (महसूल), तहसिल कार्यालय यावल, जि. जळगाव |
| २ | डॉ. विनोद मारोतराव डोणगावकर, नायब तहसिलदार, उपविभागीय अधिकारी कार्यालय राजुरा, जि. चंद्रपुर. | नागपूर | छत्रपती संभाजीनगर | नायब तहसिलदार (महसूल-२), तहसिल कार्यालय वसमत, जि. हिंगोली |
| ३ | श्री. अविनाश प्रकाश पिसाळ, नायब तहसिलदार (संगायो), तहसिल कार्यालय शिरोळ, जि. कोल्हापूर | नागपूर | पुणे | नायब तहसीलदार (महसूल), तहसिल कार्यालय मावळ, जि. पुणे |
| ४ | श्रीमती निलम दत्तात्रय ढोरजकर, नायब तहसिलदार (निवडणूक), तहसिल कार्यालय रोहा, जि. रायगड | अमरावती | पुणे | नायब तहसिलदार (महसूल), तहसिल कार्यालय पलुस, जि.सांगली |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ५ | श्रीमती सोनाली त्र्यंबक वाघ, नायब तहसिलदार (नियमित), तहसिल कार्यालय नागपूर (ग्रामीण), जि. नागपूर | नागपूर | पुणे | निवासी नायब तहसिलदार, तहसिल कार्यालय तासगाव, जि.सांगली |
| ६ | श्रीमती पद्मश्री विलास तासगांवकर, नायब तहसिलदार (इमारत शाखा), विभागीय आयुक्त कार्यालय कोकण | नागपूर | पुणे | नायब तहसिलदार, उपविभागीय अधिकारी कार्यालय कडेगाव, जि.सांगली |
| ७ | श्रीमती दर्शना रमेश सुर्यवंशी, नायब तहसिलदार (निवडणूक), ५७-उत्तर नागपूर विधानसभा मतदारसंघ, जि. नागपूर | नागपूर | पुणे | नायब तहसिलदार (महसुल), तहसिल कार्यालय पाटण, जि. सांगली |
| ८ | श्री. अनिल तुकाराम नाडेकर, नायब तहसिलदार (महसूल), तहसिल कार्यालय दर्यापुर, जि. अमरावती | अमरावती | नाशिक | नायब तहसिलदार (महसूल), तहसिल कार्यालय बोदवड, जि. जळगाव |

३. उक्त अधिकाऱ्यांची मूळ विभागातील सेवाज्येष्ठता अबाधित राहिल. सदर आदेश तात्काळ अंमलात येत असून, उपरोक्त नमूद अधिकाऱ्यांना बदलीने पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रुजू होण्यासाठी ते धारण करत असलेल्या पदावरुन या आदेशान्वये एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे.

४. संबंधित अधिकारी नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत संबंधित विभागीय आयुक्त यांनी शासनास त्वरित कळवावे.

५. संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयत्तेर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहित केलेल्या उक्त तरतुदीनुसार, पदग्रहण अवधी समाप्त होण्यापुर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास, त्यांचेविरुद्ध शासन निर्णय, क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१८६/१६/का. १४, दि.२३.१२.२०१६ मधील तरतुदीनुसार शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास, त्यांच्याविरुद्ध शिस्तभंगाची कार्यवाही सुरु करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

७. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये, तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने सदर

अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्वीकारू नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते सदर अधिकाऱ्याच्या मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

८. उपरोक्त आदेश सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमीत करण्यात येत असल्याने पदस्थापनेच्या ठिकाणी परिविक्षाधीन तहसीलदार वा अन्य अधिकाऱ्यांना विभागीय आयुक्त यांच्या स्तरावरुन तात्पुरते व्यवस्थेने पदस्थापना दिलेली असल्यास अशा अधिकाऱ्यांना विभागीय आयुक्त यांनी अन्य रिक्त पदावर पदस्थापना द्यावी. या आदेशाद्वारे पदस्थापना करण्यात आलेले अधिकारी त्यांच्या पदस्थापनेच्या पदावर रुजू झाल्यानंतर दि.१५.०३.२०२४ च्या शासन पत्रानुसार तात्पुरत्या स्वरुपात सेवा वर्ग करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांच्या सेवा मूळ पदावर पूर्ववत करण्यात याव्यात.

९. सदरहू बदली आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ही गैरवर्तणूक समजून त्यांचे विरूद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७३१२००९५१३२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRIKANT MADHUKAR MOHITE

Digitally signed by SHRIKANT MADHUKAR MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=5b514d2c3257bba976c5a2de42be8a635bba691c05d1f65ed0ead155a190e90e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F152866E6FC64E39CF88B9CB27AE0169A65B000039B269233C42B5B77F06B31, cn=SHRIKANT MADHUKAR MOHITE
Date: 2024.07.31 20:25:02 +05'30'

**(श्रीकांत म. मोहिते)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

विभागीय आयुक्त, पुणे/नागपुर/नाशिक/अमरावती विभाग, पुणे/नागपुर/नाशिक/अमरावती.

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
२. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
४. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
५. अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ३२.
६. संबंधित जिल्हाधिकारी
७. प्रधान महालेखापाल, (लेखापरीक्षा व लेखा अनुज्ञेयता) मुंबई.
८. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
९. संबंधीत अधिकारी (विभागीय आयुक्त, पुणे/नागपुर/नाशिक/ अमरावती विभाग, पुणे/नागपुर/नाशिक/ अमरावती यांच्यामार्फत).
१०. निवडनस्ती, कार्यासन ई-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.